**किमान आधारभूत खरेदी योजनेअंतर्गत धान/भरडधान्य साठवणूकीसाठी आवश्यक असलेला नवीन बारदाना खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. : नबाख-४९२३/प्र.क्र.१७५/ना.पु.१६ब,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १४ मार्च,२०२४.

**वाचा :**

१. उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-६, दि. ०१ डिसेंबर, २०१६.
२. उद्योग उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४,दि. २४ ऑगस्ट, २०१७.
३. शासन निर्णय क्र. सामुग्री-४५२३/प्र.क्र.६८/नापु-१६ब, दि.२६.०४.२०२३
४. केंद्र शासन पत्र क्र.१५-१४/२०१८-Py.iii, Dt.१३.१२.२०१८
५. शासन निर्णय क्र.खरेदी-११२३/प्र.क्र.१२३/ना.पु.२९, दि.०९.११.२०२३

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्र शासनाने किमान आधारभूत किंमत खरेदी योजने अंतर्गत बारदाना वापराविषयक दि.१३.१२.२०१८ अन्वये मार्गदर्शक सूचना दिलेल्या आहेत. उपरोक्त वाचा क्रमांक (१) मधील उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दि.०१.१२.२०१६ च्या सोबत जोडलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीच्या सुधारीत नियम पुस्तिकेतील प्रकरण क्र.२ मधील २.९.२ मध्ये राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समिती गठीत करण्याबाबतचे निर्देश देण्यात आलेले आहेत. यानुसार विभागामार्फत शासन निर्णय दि.२६.०४.२०२३ अन्वये गठीत करण्यात आलेल्या विभागीय भांडार खरेदी समितीने खरीप पणन हंगाम २०२३-२०२४ या हंगामाकरीता आवश्यक असलेला उर्वरित १६९४६ बेल्स नवीन बारदाना तसेच पुढील २ वर्ष कालावधीसाठी आवश्यक नवीन बारदाना खरेदी महाटेंडर या खरेदी पोर्टलवर EOI (Expression Of Interest ) Empanalment या प्रक्रियेच्या माध्यमातून राबविण्यात यावी, अशी शिफारस शासनास केली होती. त्यानुषंगाने सदरची खरेदी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेअंतर्गत खरीप पणन हंगाम २०२३-२०२४ याकरीता आवश्यक असलेला उर्वरित १६९४६ बेल्स नवीन बारदाना तसेच पुढील २ वर्ष कालावधीसाठी (सन २०२४-२५ व सन २०२५-२६ ) आवश्यक नवीन बारदाना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक व दि. महाराष्ट्र स्टेट को-

ऑपरेटीव्ह मार्केटींग फेडरेशन लिमिटेड यांच्या मागणीप्रमाणे त्यांना उपलब्ध करून देण्याचा निर्णय विभागीय भांडार समितीने घेतला आहे. सदर नवीन बारदानासाठीचे आधारभूत दर म्हणून ज्युट कमिश्नर, कोलकाता यांनी दरमहा ज्युट स्मार्ट पोर्टलवर प्रकाशीत (दर महिन्याच्या ७ तारखेस) केल्याप्रमाणे असावेत. उक्त दर विचारात घेऊन, नवीन बारदाना महाटेंडर या खरेदी पोर्टलवर EOI ( Expression Of Interest ) Empanalment या प्रक्रियेच्या माध्यमातून खरेदी करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. शासनाच्या महाटेंडर या पोर्टलद्वारे नवीन खरेदी करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे विहित करण्यात येत आहे :-

२.१ महाटेंडर या पोर्टलद्वारे खरेदीप्रक्रिया राबविण्याची जबाबदारी:-

महाटेंडर या पोर्टलवर ऑनलाईन निविदा प्रक्रियेद्वारे ही खरेदी करावयाची असल्याने, सदर प्रणालीचा वापर करण्यासाठी खालील नमूद अधिकाऱ्यांना जबाबदार प्राधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी महाटेंडर या पोर्टलवरील मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व बाबींची पुर्तता करणे बंधनकारक आहे.

**तक्ता -अ**

| अ. क्र. | Role in BEAM Portal | Responsibility in Mahatender Portal | प्राधिकाऱ्याचे नाव व कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | Primary User | संपूर्ण खरेदी प्रक्रियेचे संनियंत्रण, Secondary User (Buyer) व (Consignee) यांची नोंदणी Mahatender Portal वर करणे. | उपसचिव / सहसचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग. |
| २. | Secondary User (Buyer) | विभागाच्या वतीने नवीन बारदाना खरेदी करण्याची कार्यवाही करणे. | उप सचिव (नापु-१६ ब), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई. |
| ३. | Secondary User (Consignee) | Mahatender Portal वरुन खरेदी केलेल्या नवीन बारदाना प्राप्त करून घेणे व त्याची पोहोच देणे. | महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक व दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटीव्ह मार्केटींग फेडरेशन लिमिटेड |
| ४. | P.A.O./D.D.O. | Mahatender पोर्टलवरून खरेदी केलेल्या नवीन बारदानाच्या अनुषंगाने शासनाकडून प्राप्त मंजूरी आदेशाच्या (देयकाबाबत) अनुषंगाने देयक रक्कम प्रस्तावासाठी विनंती (RFP) मधील तरतुदीनुसार प्रदान करावी. | लेखाधिकारी, वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय. |

२.२ संबंधित महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक व दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटीव्ह मार्केटींग फेडरेशन लिमिटेड यांना नवीन बारदाना विहीत वेळेत पुरवठा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने जिल्हयातील सर्व गोदाम / खरेदी केंद्रांची संख्या व पत्ते इत्यादी माहिती यशस्वी निविदाकारास वेळोवेळी उपलब्ध करून देण्यात यावी.

३. महाटेंडर या पोर्टलवर उपरोक्त नवीन बारदाना खरेदी नुसार निविदेत सहभागी होणाऱ्या ईच्छुक निविदाकारांची पात्रता Request for Proposal (RFP) मध्ये तरतुदींनुसार असणे आवश्यक आहे.

४. इसारा (बयाणा) रक्कम :-

४.१ खरेदीच्या प्रकारानुसार इसारा रक्कम पुढील प्रमाणे असेल -( रुपये )

**तक्ता -ब**

| अ.क्र. | निविदा | इसारा रक्कम |
|---|---|---|
| १ | खरीप पणन हंगाम २०२३-२०२४ या हंगामाकरीता आवश्यक असलेला उर्वरित १६९४६ बेल्स नवीन बारदाना तसेच पुढील २ वर्ष कालावधीसाठी आवश्यक नवीन बारदाना खरेदी करणे | रू.१०,००,०००/- (रू. दहा लाख रूपये फक्त) |

४.२ इसाऱ्याची रक्कम या शासन निर्णयामध्ये विहित केल्यानुसार तसेच Request for Proposal )RFP ( मध्ये नमूद पध्दतीनुसार जमा करावी.

४.३ इसारा रक्कम भरलेल्यांना ऑनलाईन खरेदी प्रक्रियेमध्ये भाग घेणे बंधनकारक आहे, खरेदी प्रक्रियेमध्ये भाग न घेतल्यास त्यांची इसाऱ्याची संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

४.४ विनिर्दिष्टीत केलेल्या इसारा रक्कमेपेक्षा कमी रक्कम भरणाऱ्या पुरवठादारास अपात्र ठरवून भरलेली संपूर्ण रक्कम जप्त करण्यात यावी.

४.५ महाटेंडर या पोर्टलद्वारे पुरवठादार निश्चित झाल्यावर पात्र पुरवठादारा व्यतिरिक्त उर्वरित सर्व पुरवठादारांची इसारा रक्कम विहीत कालावधीत परत करण्यात यावी.

४.६ शासकीय मंडळ /महामंडळ/उपक्रमांना तसेच सुक्ष्म, लघु व मध्यम उपक्रमांतर्गत वरील वस्तुं व सेवा यासाठी नोंदणीकृत असलेल्या उत्पादक व पुरवठादार यांना निविदेमध्ये निविदा शुल्क व बयाना रक्कम भरण्यापासुन सुट देण्यात यावी. यामध्ये महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ / महासंघ हे वगळता इतर नोंदणीकृत पुरवठादारांना उत्पादकाकडून अधिकृत विक्रेता असल्याचे प्राधिकार पत्र सादर करणे आवश्यक राहील अथवा महाटेंडर या पोर्टलवरील तरतुदीनुसार कार्यवाही करावी.

५. निविदा शुल्क (Tender Fees)

पुरवठादारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.३.१.२.१ व त्यानुषंगाने नमूद परिशिष्ट-८ मधील तरतूदीनुसार प्रस्तुत सेवा खरेदी निविदेचे निविदा शुल्क (Tender Fees) रक्कम रू.३५,०००/ इतकी रक्कम डिमांड ड्राफ्ट वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे नावे तयार करून ते अवर सचिव (नापु-१६ब), अन्न, नागरी

पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, रूम.नं.एम-२, पोटमाळा, ॲनेक्स इमारत, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावेत.

६. अनामत रक्कम (Security Deposit):-

६.१ पुरवठादारास उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.४.६ मधील तरतूदीनुसार खरेदी मुल्याच्या ३% अनामत रक्कम पुरवठा आदेश निर्गमित केल्यानंतर डिमांड ड्राफ्ट / FDR वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे नावे तयार करून ते अवर सचिव (नापु-१६ब), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, रूम.नं.एम-२, पोटमाळा, ॲनेक्स इमारत, मंत्रालय, मुंबई यांचेकडे जमा करावेत.

६.२ अनामत रकमेवर कोणतेही व्याज देय राहणार नाही. तसेच, यशस्वी निविदाकारानी/पुरवठादारानी करारातील कोणत्याही अटीचा भंग केल्यास अनामत रक्कम जप्त करण्यात येईल व त्यांचे नाव काळ्या यादीत टाकण्यात येईल.

७. पुरवठा कालावधी :

७.१ यशस्वी पुरवठादारांस खरीप पणन हंगाम २०२३-२४ तसेच पुढील २ वर्ष कालावधीसाठी (सन २०२४-२५ व सन २०२५-२६) empanelment करण्यात येऊन त्यांच्याकडून ज्युट कमिश्नर, कोलकाता यांनी दरमहा ज्युट स्मार्ट पोर्टलवर प्रकाशीत (दर महिन्याच्या ७ तारखेस) केलेले दर विचारात घेऊन खरेदी करण्यात येईल. तसेच सदरील empanelment पुढील १ वर्षासाठी वाढवून देण्याचा अधिकार शासनाचा असेल. तसेच पुरवठा आदेशाच्या अनुषंगाने पुरवठा आदेश मिळाल्यापासून शासकीय कामकाजाचे ३० दिवसाच्या आत नवीन बारदाना पुरवठा करणे आवश्यक आहे. तसेच केंद्रशासनाने बारदाना वापराशी संबंधीत वेळोवेळी दिलेल्या मार्गदर्शक सुचनांप्रमाणे पणन हंगामानुसार कलर कोंडीग विचारात घेऊन नवीन बारदाना पुरवठा करणे आवश्यक आहे.

७.२ यशस्वी निविदाकारानी/पुरवठादारानी संबंधित खरेदी केंद्रावर नवीन बारदाना पोहोच केल्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित गोदामपाल/खरेदी केंद्र प्रमुख यांनी द्यावे. तद्नंतर सदर नवीन बारदाना पोहोच झाल्याचे तसेच प्राप्त नवीन बारदाना दर्जाधारक (IS१६१८६: २०१४) असल्याचे अनुषंगाने संबंधित RMO/ DMO यांनी प्रमाणित करून तसा अहवाल शासनास १० दिवसाच्या आत सादर करावा.

८. पुरवठ्यास विलंब झाल्यास करावयाची कार्यवाही :-

यशस्वी निविदाकारानी/पुरवठादारानी विहित मुदतीत नवीन बारदाना पुरवठा न केल्यास होणाऱ्या हानीची भरपाई उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि.०१/१२/२०१६ रोजीच्या शासन निर्णायामध्ये नमूद कार्यपद्धतीनुसार त्यांच्या देयकातून करण्यात येईल.

९. करारनाम्यामधील तरतूदीसंदर्भात वाद विवाद व अपिल:-

करारनाम्यामधील अटी व शर्तीसंदर्भात तसेच दंड, वसूली इ. संदर्भात सेवा पुरवठादार निर्णय दिल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात शासनाकडे कडे दाद मागू शकेल. शासनाने दिलेला निर्णय अंतिम राहील आणि तो दोन्ही पक्षांना बंधनकारक राहील.

पुरवठादार करारनामा संपल्यानंतर जास्तीत जास्त ६ महिन्यात त्यातील तरतूदीसंदर्भात दाद मागू शकेल.

१०. सदर निविदा रद्द करण्याचे किंवा स्विकारण्याचे अंतिम अधिकार शासनाकडे राहतील.

११. या कामी येणारा खर्च हा मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार साठवणूक यांवरील भांडवली खर्च, ०१-अन्न, १०१- प्रापण व पुरवठा, (०२) प्रापण व वितरण व किंमत नियंत्रण (०२)(१३) मुंबई शहर किमान आधारभूत किंमत योजने खालील भरडधान्य/ धान वरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) (४४०८०३९१) ५०, इतर खर्च या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

१२. सदर शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.रवका-१०९८/५६७/प्र.क्र.२३३८/नापु-१२, दि.३० नोव्हेंबर, १९९८, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-२, उपविभाग-४, अ.क्र.१५ व २७ प्रमाणे प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर प्रस्तावास वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७८६/दि.०६/०३/२०२४ या अन्वये वित्त विभागाने सहमती दर्शविलेली आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१४२०४५१३०३०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHREE RAHUL SARANG

Digitally signed by RAJASHREE RAHUL SARANG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=5c072530c0f2940404764b5dc00127bb99ecf9466431dc1a1a4e123b229e41c0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B9A36FAE4EC39263A2A8DF78B48FC28B92B165E239815B0CDCEF1A4B5928579, cn=RAJASHREE RAHUL SARANG
Date: 2024.03.14 20:56:32 +05'30'

**( राजश्री सारंग )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व विभागीय आयुक्त,
६) नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
७) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
८) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
९) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)

१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
११) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१२) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१३) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१९) वित्त विभाग ( व्यय १०), मंत्रालय, मुंबई.
२०) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई.
२१) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या.नाशिक
२२) सरव्यवस्थापक, दि. महाराष्ट्र स्टेट को-ऑपरेटीव्ह मार्केटींग फेडरेशन लिमिटेड
२३) निवड नस्ती/नापु-१६ब.